मुरबाड पंचायत समिती (जिल्हा ठाणे) प्रशासकीय
इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००९/प्र.क्र.१०३/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९

संदर्भ :- मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,ठाणे यांचे पत्र क्र.ठाजिप/बांवि/प/एलआर/०९/२८,दि.९.६.०९

प्रस्तावना :-

मुरबाड पंचायत समितीच्या अखत्यारीतील सर्व खात्यांना जागा अपुरी असल्याने तेथील कर्मचाऱ्यांची बसण्याची गैरसोय होत आहे, काही विभागाच्या खातेप्रमुखांना बसण्यासाठी स्वतंत्र विभाग नाही, पंचायत समितीच्या अखत्यारीतील कृषी विभाग, पशुसंवर्धन विभाग, तालुका आरोग्य अधिकारी इत्यादि विभागीय कार्यालये विखुरलेली असून, सदरील इमारती जीर्ण झालेल्या आहेत. त्यामुळे पंचायत समितीची सर्व कार्यालये एकाच ठिकाणी आणण्याच्या दृष्टीने पंचायत समितीच्या मालकीच्या जागेवर नविन प्रशासकीय इमारत बांधण्याच्या प्रस्तावास मान्यता मिळण्याची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांनी संदर्भीय दिनांक ९.६.२००९ च्या पत्रान्वये विनंती केली आहे.

२. मौजे मुरबाड येथे पंचायत समितीच्या अखत्यारीतील कृषी विभाग व पशुसंवर्धन विभागाची कौलारु इमारत मोडकळीस आलेली असल्याने सदरील इमारत पाडून त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्याचे प्रस्तावित आहे. या करीता पंचायत समितीने दिनांक २२.९.२००८ रोजी ठराव पारीत केला असून, त्याची प्रत प्रस्तावासोबत सादर करण्यात आली आहे. नविन इमारतीचे बांधकाम अस्तित्वातील पंचायत समितीच्या मालकीच्या न.भू.क्र.१५७ जागेवर करावयाचे असून, त्याबाबत जागेचा उताऱ्याची प्रत प्रस्तावासोबत सादर करण्यात आली आहे. प्रस्तावित बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्र, सा.बां.वि. मुंबई यांच्याकडील टी/एडीम/१५११ हा नमुना नकाशा वापरण्यात आला असून, पंचायत समितीच्या इमारती करीता एकूण १०२६.५६ चौ.मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित करण्यात आले आहे. सदर आराखड्यानुसार प्रस्तावित बांधकामाकरीता सन २००८-०९ च्या दरसूचीनुसार रु. १,७४,५३,२७४/- किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर करण्यात आले आहे. सदरील सविस्तर अंदाजपत्रक शाखा अभियंता (बांध), जि.प.ठाणे यांनी तयार केले असून, उप अभियंता, उपविभाग मुरबाड व कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प., ठाणे यांनी साक्षांकित केले आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., ठाणे यांनी प्रस्तावासोबत अस्तित्वातील कार्यालयीन इमारत मोडकळीला आल्याबाबतचे प्रमाणपत्र, अस्तित्वातील इमारतीचे फोटो, जागा मालकीचे कागदपत्र, जागेचा नकाशा, पंचायत समितीच्या ठरावाच्या प्रती सादर केलेल्या आहेत

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांनी केलेल्या तांत्रिक छाननी अंती, मुरबाड पंचायत समितीच्या रु.१,७४,५३,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

मुरबाड (जिल्हा-ठाणे ) पंचायत समितीच्या अधिनस्थ असलेल्या जुन्या मोडकळीस आलेल्या इमारती पाडून, त्या जागी नवीन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रक्कम रुपये- १,७४,५३,०००/- (रुपये एक कोटी चौऱ्याहत्तर लक्ष त्रेपन्न हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) नियोजित मुरबाड पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि. मुंबई यांच्याकडील नमुना नकाशामध्ये शासन मान्यते शिवाय कोणताही फेरबदल करण्यात येवू नये.
(२) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.
(३) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी. प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.
(४) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

(५) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

४. मुरबाड पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

| GENERAL ABSTRACT | | |
|---|---|---|
| Sr. | Work Details | Amount (In Rs) |
| 1 | Estimate Cost of Admn.Bldgs for Panchayat samiti | 13323126.00 |
| 2 | Add 11% For Electrycity | 1465544.00 |
| 3 | Add 8% For Water supply & sanitation | 1065850.00 |
| 4 | Add 4% For Contingency | 532925.00 |
| 5 | Add 2% For Computerisation | 266462.00 |
| 6 | Add 6% For Price Escalation | 799367.00 |
| | Estimated cost Rs. | 17453274.00 |
| | Say Rs. | Rs. 1,74,53,000.00/- |

५. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल.

६. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

८. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.२००९०८३११७५९०९००१ असाआहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद ठाणे
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा ठाणे
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा ठाणे विभाग, ठाणे
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, ठाणे
१०) सभापती, पंचायत समिती, मुरबाड, जिल्हा ठाणे
११) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, मुरबाड, जिल्हा ठाणे
१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४)का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई